**स्वेच्छा सेवा निवृत्तीबाबत...**
**डॉ.(श्रीमती) जयश्री संजीव बोराडे,**
**वैद्यकीय अधिकारी, गट-अ.**

# महाराष्ट्र शासन

सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन आदेश क्रमांकः राकावि-२०२०/प्र.क्र. १२६/सेवा-१,
गोकूळदास तेजपाल रुग्णालय संकूल इमारत,
८ वा मजला, लोकमान्य टिळक रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
दिनांक: १० ऑगस्ट, २०२०.

**संदर्भ:** आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांचे पत्र क्रमांक : मु.का.अ./म.का.वि.सो./ डॉ.(श्रीमती) बोराडे/वै.अ./गट-अ/स्वे.से.नि./का.क्र. १/४४४२-४४/२०२०, दिनांक ०८ मे, २०२०.

**शासन आदेश:-**

आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांनी संदर्भाधीन पत्रान्वये डॉ (श्रीमती) जयश्री संजीव बोराडे, वैद्यकीय अधिकारी, गट-अ, सेवा दवाखाना, अमरावती यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन), नियम १९८२ मधील नियम ६६ अनुसार दिनांक ०१.०४.२०२० (मध्यान्होपूर्व) पासून स्वेच्छा सेवानिवृत्त करण्यात यावे व त्याबाबतचा आदेश निर्गमित करावा, अशी विनंती केली आहे.

विषयांकित प्रकरणी डॉ. (श्रीमती) जयश्री संजीव बोराडे, यांनी दिनांक ३१.१२.२०१९ रोजी स्वेच्छानिवृत्तीची तीन महिन्यांची अग्रीम नोटीस दिली आहे. त्यांच्या प्रकृती अस्वास्थामुळे व वैयक्तिक अडचणीमुळे त्यांनी स्वेच्छानिवृत्तीचा अर्ज सादर केला आहे. दिनांक ३१.०३.२०२० रोजी तीन महिन्यांच्या कालावधी पूर्ण झाला असल्याने स्वेच्छानिवृती मंजूर झाली आहे, असे गृहीत धरुन दिनांक ३१.०३.२०२० रोजी मध्यान्होनंतर त्या स्वत:हून सेवामुक्त होत असल्याचा अर्ज त्यांनी आयुक्तालयाकडे सादर केला आहे.

डॉ. (श्रीमती) जयश्री बोराडे यांची प्रथम नियुक्ती प्रादेशिक दुय्यम सेवा निवड मंडळ, नागपूर यांच्या दिनांक २४.०९.१९९२ च्या शिफारस पत्रान्वये वैद्यकीय अधिकारी, गट-ब (तेव्हाचे वर्ग-तीन) पदावर करण्यात आली होती. त्यानुसार त्या दिनांक ०८.०२.१९९३ (मध्यान्होपूर्व) रोजी वैद्यकीय प्रशासन अधिकारी, रा.का.वि.यो. रुग्णालय, नागपूर अंतर्गत सेवा दवाखाना पुलगांव येथे रुजू झाल्यात. दिनांक १४.०५.२०१२ रोजीच्या शासन आदेशान्वये त्यांची वैद्यकीय अधिकारी, गट-अ पदावर पदोन्नती झाली आहे. दिनांक ३१.०३.२०२० (म.नं.) पर्यन्त त्या वैद्यकीय अधिकारी, गट-अ या पदावर सेवा दवाखाना, अमरावती येथे कार्यरत होत्या.

डॉ. बोराडे यांनी म.ना.से. (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम ६६ (१) मधील तरतुदीनुसार २० वर्षांची अर्हताकारी सेवा पूर्ण केली आहे. तसेच, म.ना.से. (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम ६६ (५) मधील तरतुदीनुसार डॉ. बाराडे यांनी स्वेच्छानिवृत्तीची नोटीस विहित कालावधीत मागे न घेतल्याने, म.ना.से. (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम ६६ (२) मधील तरतुदीनुसार डॉ. बोराडे ह्या आपोआपच स्वेच्छानिवत्तीच्या नोटीसीच्या समाप्तीच्या दिनांकास स्वेच्छानिवृत्त झाल्याचे मानले आहे. सबब, डॉ. बोराडे यांनी दिलेली स्वेच्छानिवृत्तीची नोटीस स्वीकारण्यात येत आहे व म.ना.से. (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम ६६ (१) (२) (५) मधील तरतुदीनुसार डॉ. (श्रीमती) जयश्री बोराडे, वैद्यकीय अधिकारी, गट-अ ह्या दिनांक ०१.०४.२०२० (मध्यान्होपूर्व) पासून स्वेच्छेने सेवानिवृत्त झाल्या असल्याचे घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८१०१४३०२११२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra R Gadhari

Digitally signed by Ravindra R Gadhari
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9668226de60c3cc5b8ccd56833c07d32831e4140f3de291d1f40d510d295643f, serialNumber=8f564edcac5a4c4a79542e69f18152eb1ab86474731f4ac3d8424b8b56a653e1, cn=Ravindra R Gadhari
Date: 2020.08.10 17:10:02 +05'30'

(र.र.गढरी)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

(१) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
(२) आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मंबई.
(३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कामगार विमा सोसायटी, मुंबई.
(४) संचालक (प्रशासन/वैद्यकीय), राज्य कामगार विमा योजना, मुंबई.
(५) वैद्यकीय प्रशासन अधिकारी, रा.का.वि.यो., विदर्भ विभाग, इमामवाडा, नागपूर.
(६) प्रभारी वैद्यकीय अधिकारी, सेवा दवाखाना, अमरावती.
(७) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
(८) डॉ. (श्रीमती) जयश्री बोराडे, वैद्यकीय अधिकारी, गटअ (आयुक्त कार्यालय यांचे मार्फत),
(९) निवड नस्ती (सेवा-१), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.